निरीक्षक (गट-ब), राउशु या पदावरील पदोन्नती नाकारलेल्या कर्मचाऱ्यासंबंधी अवलंबावयाच्या कार्यवाहीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक- इएसटी-१७२१/प्र.क्र.१५६/राउशु-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. ०४ मार्च, २०२२.

वाचा:-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६

२) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई यांचे पत्र क्र. इएसटी ११२०/२८/२-अ-१, दि.२२.१०.२०२१.

३) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई यांचे पत्र क्र. इएसटी ११२०/९५/२-अ-१, दि.२०.०१.२०२२ व दि.२८.०१.२०२२.

**शासन आदेश:-**

सन २०२०-२१ ची निवडसूची वर्षात राज्य उत्पादन शुल्क विभागातील दुय्यम निरीक्षक (गट-क) या पदावरून निरीक्षक (गट-ब) या पदावर पदोन्नती देण्यासाठी, विभागीय पदोन्नती समितीच्या शिफारशीच्या अनुषंगाने, सामान्य प्रशासन विभागाने ६० पदांच्या निवडसूचीस मान्यता दिली आहे. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई यांनी संदर्भ क्र. २ व ३ वरील पत्रांन्वये निवडसूचीतील खालील दुय्यम निरीक्षकांनी पदोन्नती नाकारली असल्याचे कळविले आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव |
|---|---|
| १ | श्री.अशोक ज.यादव |
| २ | श्री.एम.के.निमंदे |
| ३ | श्री.विरेंद्रसिंह वसंतराव चौधरी |
| ४ | श्री.अब्दुल कय्युम सुलतान मोमीन |
| ५ | श्री.अतुल बाबुराव पाटील |
| ६ | श्री.निलेश अरुण गोसावी |
| ७ | श्री.प्रविण म्हस्कू कांबळे |
| ८ | श्री.किरण माधव पवार |
| ९ | श्री.राजेंद्र काशीराम लब्दे |
| १० | श्री.एम.एस.होळ |
| ११ | श्री.एस.डी.कदम |
| १२ | श्री.चंद्रकांत सिताराम रासकर |
| १३ | श्री.पुंडलिक परशुराम घुले |
| १४ | श्री.जितेंद्र श्रीराम पवार |
| १५ | श्री.नारायण हरीहर गोसावी |

२. सामान्य प्रशासन विभागाने दिनांक १२.०९.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांस अनुसरून, उक्त तक्त्यातील १५ दुय्यम निरीक्षकांनी पदोन्नती नाकारली असल्याने त्यांची नावे सन २०२०-२१ च्या निवडसूचीतून वगळण्यात येत असून, यापुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूचींमध्ये ( सन २०२१-२२ ची निवडसूची व २०२२-२३ ची निवडसूची यांमध्ये ) त्यांच्या नावांचा समावेश करता येणार नाही.

३. तसेच, पदोन्नती नाकारलेल्या कर्मचाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेंतर्गत लाभ दिले असल्यास ते काढून घेण्यासंदर्भात, त्याचप्रमाणे वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार, या प्रकरणी कार्यवाही करणे आवश्यक असल्यास तशी कार्यवाही आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई यांच्या स्तरावर करण्यात यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०४१७२७३८२३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandeep Gorakhnath Dhakane

Digitally signed by Sandeep Gorakhnath Dhakane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, cn=Sandeep Gorakhnath Dhakane
Date: 2022.03.04 17:40:02 +05'30'

**( संदिप ढाकणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
५) संबंधित अधीक्षक, राउशु.
६) संबंधित कर्मचारी (मार्फत आयुक्त, राउशु, मुंबई).
७) निवडनस्ती, कार्यासन-राउशु-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.